वित्त विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २ जुलै १९९३.

भारताचे संविधान.

क्रमांक : वेतन-१०८८/प्र.क्र.२५३/सेवा-३. -- भारताच्या संविधनाचा अनुच्छेद ३०९ याच्या परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन महाराष्ट्राचे राज्यपाल, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ ला आणखी सुधारणा करणारे पुढील नियम करीत आहेत.

(१) या नियमास, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) (सुधारणा) नियम, १९९३ असे मानावे.

(२) महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ११ मध्ये, -

(अ) पोटनियम (१) ऐवजी खालील पोटनियम दिनांक ५ ऑक्टोबर १९८१ पासून घालण्यात यावा आणि घालण्यात आला असे मानावे :-

" (१) नवीन पदावरील नियुक्तीमुळे जुन्या पदाच्या कर्तव्यापेक्षा किंवा जबाबदाऱ्यांपेक्षा अधिक महत्वाची कर्तव्ये किंवा जबाबदाऱ्या येत असतील, आणि -

(ए) रु. १,५०० किमान वेतन असलेल्या समय वेतनश्रेणीच्या वर्ग-१ च्या पदापैक्षा उच्च पद जर तो धारण करीत नसेल तर, त्याचे वरच्या पदाच्या समयश्रेणीतील प्रारंभिक वेतन हे, खालच्या पदावर ज्या टप्प्याला त्याचे वेतन असेल त्या टप्प्याला एक वेतनवाढ मिळविल्यावर, आणि वेतनमानातील कमाल वेतन घेणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत मागील वेतनवाढीइतकी रक्कम मिळविल्यावर, जे मानीव वेतन येईल त्याच्या पुढील टप्प्यावर निश्चित करण्यात येईल; आणि

(बी) रु. १,५०० पेक्षा अधिक किमान वेतन असलेल्या समय वेतन श्रेणीतील वर्ग-१ चे पद जर तो धारण करीत असेल तर, वरच्या पदाच्या समय श्रेणीमधील जो टप्पा त्याच्या जुन्या (खालच्या) पदावरील वेतनाच्या लगतनंतरच्या असेल त्या टप्प्यावरील वेतन त्याला प्रारंभिक वेतन म्हणून मिळेल :

परंतु जो शासकीय कर्मचारी एकाच बढतीक्रमामधील उच्च पदावर नियमितपणे पदोन्नत झाला असेल, त्याला वेतननिश्तितीसाठी पदोन्नतीच्या दिनांकापासून १ महिन्याच्या मुदतीत खालीलप्रमाणे विकल्प देता येईल :-

(एक) खालच्या पदावरील वेतनश्रेणीत पुढील वेतनवाढीनंतर पुनर्विचार न होता सरळ खंड-ए अनुसार वेतन निश्चित करण्यात यावे ; किंवा

(दोन) सुरुवातीस त्याचे वेतन खंड- बी अनुसार निश्चित करण्या यावे आणि खालच्या पदावरील वेतनश्रेणीत पुढील वेतनवाढ मिळण्याच्या दिनांकास त्याचे वेतन खंड-ए प्रमाणे पुनर्निश्चित करण्यात यावे.

जर त्याच्या विकल्पानुसार त्याचे वेतन खालच्या पदावरील वेतनवाढ मिळाल्यानंतर पुनर्निश्चित करण्यात आलेले असेल तर त्याचा पुढील वेतनवाढीचा दिनांक वेतन पुननिश्चितीच्या दिनांकापासून १२ महिने पूर्ण झाल्यानंतर असेल. " ;

(बी ) पोटनियम (५) खालील स्पष्टीकरण दिनांक ५ ऑक्टोबर १९८१ पासून गाळण्यात यावे आणि गाळण्यात आले असे मानण्यात यावे ;

(सी ) सूचना २ नंतर परंतु त्याखालील टिपेच्या आधी खालील सूचना-३ आणि ४ अनुक्रमे दिनांक १ मे १९८१ आणि दिनांक ५ ऑक्टोबर १९८१ पासून घालण्यात याव्यात आणि घालण्यात आल्या असे मानण्यात यावे ;

**सूचना:३ -** जर रु.१,५०० पेक्षा अधिक किमान वेतन नसलेल्या वेतनश्रेणीत वेतन घेत असलेला एखादा ज्येष्ठ कर्मचारी दिनाक १ मे १९८१ पूर्वी पदोन्नत झालेला असेल आणि त्याचे वेतन सरळ नियम ११ (१) (ए) अनुसार निश्चित केलेले असेल तो दिनांक १ मे १९८१ रोजी किंवा त्यानंतर पदोन्नत झालेला आणि ज्याचे वेतन नियम ११(१) च्या परंतुकामधील खंड (२) मधील तरतुदीनुसार सुरुवातीस सुरुवातीस नियम ११(१) (बी) अनुसार निश्चित करुन ते खालच्या पदावर त्याला वेतनवाढ मिळाल्यानंतर नियम ११(१) (ए) अनुसार पुनर्निश्चित करण्यात आले असेल अशा कनिष्ठ कर्मचाऱ्यापेक्षा कमी वेतन घेत असेल तेव्हा त्या ज्येष्ठ कर्मचाऱ्याचे वेतन कनिष्ठ कर्मचाऱ्याच्या वेतनाइतके, नियम ४० खाली, कनिष्ठ कर्मचाऱ्याचे वेतन नियम ११(१) च्या परंतुकातील खंड-२ अनुसार निश्चित केलेल्या दिनांकापासून ऊंचावण्यात यावे. त्यासाठी वरील सूचना-३ मधील अट (ए) ते (सी) पूर्ण झाल्या पाहिजेत.

**सूचना : ४ -** जर रु.१,५०० पेक्षा अधिक किमान वेतन नसलेल्या वेतनश्रेणीत वेतन घेत असलेला एखादा वर्ग-१ चा ज्येष्ठ अधिकारी दिनांक ५ ऑक्टोबर १९८१ पूर्वी उच्च पदावर पदोन्नत झालेला असेल परंतु तो दिनांक ५ ऑक्टोबर १९८१ रोजी किंवा त्यानंतर पदोन्नत झालेल्या त्यात्यापेक्षा कनिष्ठ असलेल्या अधिकाऱ्यापेक्षा कमी वेतन घेत असेल तर त्या वर्ग-१ च्या ज्येष्ठ अधिकाऱ्याचे उच्च पदावरील वेतन त्याच्यापेक्षा कनिष्ठ असलेल्या अधिकाऱ्याच्या उच्च पदावरील वेतनाइतके वेतन कनिष्ठ अधिकाऱ्याच्या पदोन्नतीच्या दिनांकापासून नियम ४० खाली, खालील अटींच्या अधीन राहून, ऊचावण्यात यावे आणि त्या ज्येष्ठ अधिकाऱ्याला पुढील वेतनवाढ त्याच्या वेतनाच्या पुनर्निश्चितीनंतर वेतन वाढीसाठी आवश्यक असलेली अर्हताकारी सेवा पूर्ण केल्यानंतर मिळेल :-

(ए) ज्येष्ठ व कनिष्ठ अधिकारी हे दोघे एकाच संवर्गातील असले पाहिजेत आणि ज्या पदावर त्यांची नियमित पदोन्नती झाली आहे ते पद समरुप, आणि एकाच संवर्गातील व एकाच बढतीक्रमातील असले पाहिजे ;

(बी) ज्या खालच्या आणि वरच्या पदावर वेतन घेत असतील त्या पदाच्या वेतनश्रेणी समरुप असाव्यात ; आणि

(सी) निर्माण झालेली विसंगती ही या तरतुदीचा प्रत्यक्ष परिणाम म्हणून झालेली असावी. उदाहरणार्थ जर खालच्या पदावरसुध्दा कनिष्ठ अधिकारी वेतननिश्चितीच्या सर्वसाधारण नियमानुसार वेतन निश्चित केल्यामुळे अथवा त्याला मंजूर करण्यात आलेल्या आगाऊ वेतनवाढीमुळे अथवा या तरतुदी ऐवजी अन्य तरतुदीनुसार वेतननिश्चिती केल्यामुळे जास्त वेतन घेत असेल तर जेष्ठ अधिकाऱ्याचे वेतन ऊचावण्यासाठी या तरतुदी लागू करता येणार नाहीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**पी. सुब्रम्हण्यम**
शासनाचे प्रधान सचिव.

प्रति,

सचिव, वित्त मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र, मुंबई, ( ८० प्रती),
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई (८० प्रती),
महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपुर,(४० प्रती)
महालेखापाल -२ (लेखा परिक्षा) -२ महाराष्ट्र नागपुर,(४० प्रती)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,,(४० प्रती)
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई, (५ प्रती)
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
* प्रबंधक उच्च न्यायालय, (मूळ शाखा) मुंबई,
* प्रबंधक उच्च न्यायालय, (अपील शाखा) मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
मंत्रालयातील सर्व विभाग,
मंत्रालयाच्या निरनिराळया विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, सेवा -३, वित्त विभाग,

**FINANCE DEPARTMENT**

**Mantralaya, Bombay 400 032, dated the 2nd July 1993.**

**CONSTITUTION OF INDIA**

No.PAY-1088/CR-253/SER-3.- In exercise of the powers conferred by the proviso to article 309 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules further to amend the Maharashtra Civil Services (Pay) Rules, 1981, as follows, namely:-

1. These rules may be called the Maharashtra Civil Services (Pay) (Amendment)Rules, 1993.

2. In the Maharashtra Civil Services (Pay) Rules, 1981, in rule 11, -

(a) for sub-rule (1), following sub-rule shall be and shall be deemed to have been substituted with effect from the 5th October 1981, namely :-

"(1) When appointment to the new post involves assumption of duties or responsibilities of great importance than those attaching to the old post; and

(a) if he is bolding a post not higher than class I post, the minimum pay of which is Rs.1,500 his initial pay in the time- scale of the higher post shall be fixed at the stage next above the pay notionally arrived at by increasing his pay in respect of the lower post by one increment at the stage at which such pay has occured and in the case of a Government servant drawing pay at the maximum of the pay-scale by an amount equivalent to the last increment; and

(b) if he is holding a post which is also a Class I post and earries a time- scale of pay the minimum of which is more than Rs.1,500 he will draw as initial pay the stage of the time-scale next above his pay in respect of the old (lower) posts :

Provided that a Government servant who is regularly promoted to the higher post which is in direct line of promotion, may, at his option, to be exercised within one month from the date of his promotion, elect to get his pay fixed in one of the following manners, namely :-

(i) ether to get his pay fixed under clause (a) straightway without any further review on accrual of increment in the pay-scale of the lower posts; or

(ii) to get his pay fixed under clause (b) initially and to get his pay refixed under clause (a) on the date of accrual of next increment inthe scale of the lower post.

If the pay is refixed under clause (a) on accrual of the increment in the lower post as per his option, the date of next increment shall fall due on completion of 12 months from the date of pay is refixed." ;

(b) Explanation below sub-rule (5) shall be and shall be deemed to have been deleted with effect from the 5th October 1981 ;

(c) after Instruction 2 but before the Note thereunder, the following Instruction 3 and 4 shall be and shall be deemed to have been inserted with effect from the 1st May 1981 and the 5th October 1981, respectively namely :-

**Instruction 3**.- In case a senior Government servant drawing pay in a pay -scale, the minimum of which does not exceed Rs.1,500 who is promoted prior to the 1st May 1981 and in whose case pay was fixed straightway under rule 11 (1) (a) draws less pay than his junoor promoted on or after the 1st May 1981 and in whose case pay was initially fized in terms of clause (ii) of the proviso to rule 11 (1) in the manner as provided under rule 11(1)(b) and the same was refixed under rule 11(1)(a) on the date of accrual of next increment in the lower post, the pay of the senior Government servant should be stepped up to a figure equal to the pay as fixed for the junior Government servant in that higher post under rule 40, from the date, the pay of the junior Government servant was refixed in the higher post in terms of clause (ii) of the proviso to rule 11(1) and it shall be subject to the fulfilment of the conditions mentioned at (a) to (c) of Instruction 3 above.

**Instruction-4**, - In case, a senior Class I Officer drawing pay in the pay-scale, the minimum of which does not exceed Rs.1,500 who is promoted to a higher post prior to the 5th October 1981 but drawing less pay than his junior promoted subsequently to higher post on or after the 5th October 1981, the pay of the senor Class I Officer in the higher post should be stepped up to a figure equal to the pay as fixed for the junior subject to the fulfilment of the following conditions and the next increment of such senior officer will be drawn on completion of the required qualifying service with effect from the date of refixation of pay, namely :-

(a) bothe the senior and junior officer should belong to the same cadre and the post in which they have been promoted on regular basis should be idential and in the same cadre and in the same line of promotion;

(b) scales of pay of the lower and higher post in which they are entitled to draw pay should be identical; and

(c) the anomaly should be directly as a result of this provision. For example, if even in the lower post the junior officer was in receipt of higher pay than the senior officer by virtue of fixation of pay under the normal rules or due to any advance increments granted to him or, fixation of pay of the junior officer on promotion was regulated under different provisions other than these provisions, then the provisions contained in respect of stepping up of the pay should not be evoked to step up the pay of the senior officer.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

**P. SUBRAHMANYAM,**
Principal Secretary to Government.

To,

The Secretary to Government of India, Ministry of Finance, New Delhi,
Accountant General Maharashtra-I (Accounts and Entitlement), Bombay (80 Spare copies),
Accountant General-1 (Audit), Bombay (80 copies),
Accountant General, (Accounts and Entitlement), Maharashtra-II, Nagpur (40 Spare copies),
Accountant General Maharashtra-II, Nagpur ((40 copies),
The Pay and Accounts Officer, Bombay (40 copies),
The Resident Audit Officer, Bombay,
The Chief Auditor, Local Fund Accounts, Bombay,
The Senior Deputy Director, Commercial Audit Circle, Worli, Bombay-400 018,
The Secretary to Governor
The Private Secretary to Chief Minister,
The Private Secretary to Chief Minister,
The Personal Assistants to all Ministers and Ministers for State,
All Divisional Commissioner, Bombay/Pune/Aurangabad/Nagpur,
* The Prothonotary and Senior Master, High Court of Judicature, Bombay,
* The Registrar, Office of the Lokayukta and Upa-Lokyauykta, Bombay,
* The Registrar High Court of Judicature, Appellate Side, Bombay,
* The Secretary, Maharashtra Public Service Commission, Bombay,
* The Secretary, Maharashtra Legislature Secretariat, Bombay,
The Chief Executive Officers of all Zill Parishads,
All Department of Maharashtra,
All Heads of Departments and Heads of Officers under the various Departments of Mantralaya,
All Desks in Finance Department,
Select File, Desk SER-3, Finance Department.

*By letter.

वित्त विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३ जुलै,१९९३

भारताचे संविधान.

क्रमांक वेतन १०८८/प्र.क्र.२५३/सेवा-३-भारताच्या संविधानाचा अनुच्छेद ३०९ याच्या परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन महाराष्ट्र राज्यपाल, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ ला आणखी सुधारणा करणारे पुढील नियम करीत आहेत :-

१) या नियमांस, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) (दुसरी सुधारणा) नियम,१९९३ असे मानावे.

२) महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ च्या नियम ११ च्या पोटनियम (१) ऐवजी खालील पोटनियम दिनांक १ जानेवारी १९८६ पासून घालण्यात यावा आणि आणि घालण्यात आला असे मानावे :-

"(१) नवीन पदावरील नियुक्तीमुळे जुन्या पदाच्या कर्तव्यांपोटी किंवा जबाबदा-यापेक्षा अधिक महत्वाची कर्तव्ये किंवा जबाबदा-या येत असतील तर त्याचे वरच्या पदाच्या समय वेतनश्रेणीतील प्रारंभिक वेतन हे, खालच्या पदावर ज्या टप्प्याला त्यांचे वेतन असेल त्या टप्प्याला एक वेतनवाढ मिळविल्यावर, जे मानवी वेतन येईल त्यांच्या पुढील टप्प्यावर निश्चित करण्यात येईल :

परंतु जो शासकीय कर्मचारी एकाच बढती क्रमामधील उच्च पदावर नियमितपणे पदोन्नत झाला असेल तर त्याला वेतननिश्चितीसाठी पदोन्नतीच्या दिनांकापासून १ महिन्याच्या मुदतीत खालीलप्रमाणे विकल्प देता येईल :-

(एक) खालच्या पदावरील वेतनश्रेणीत पुढील वेतनवाढीनंतर, पुनर्विचार न होता त्याचे प्रारंभिक वेतन वरच्या पदावर सरळ हया पोटनियमानुसार निश्चित करण्यात यावे., किंवा

(दोन) पदोन्नतीनंतर सुरुवातीस त्याचे वेतन जुन्या (खालच्या) पदावरील समयश्रेणीतील वेतनाच्या पुढील टप्प्यावर निश्चित करण्यात यावे आणि खालच्या पदावरील वेतनश्रेणीतील वेतनवाढीच्या दिनांकास त्याचे वेतन पोटनियम १ अनुसार पुनर्निश्चित करण्यात यावे.

जर त्याचे वेतन त्याच्या विकल्पानुसार खालच्या पदावरील वेतनवाढ मिळाल्यानंतर पुनर्निश्चित करण्यात आलेले असेल तर त्यंच्या पुढील वेतनवाढीचा दिनांक वेतन पुनर्निश्चितीच्या दिनांकापासून १२ महिने पूर्ण झाल्यानतर असेल."

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

पी.सुब्रह्मण्यम्
शासनाचे प्रधान सचिव.

प्रति,

सचिव, वित्त मंत्राल,भारत सरकार, नवी दिल्ली,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र मुंबई ( ८० प्रती),
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ( ८० प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर ( ४० प्रती),
महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर ( ४० प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ( ४० प्रती),
निवासी लेखा लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई ( ५ प्रती),
मुख्य लेखा परक्षक, स्थानिक निधी व लेखा, नवी मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्याचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी न्यायालय, मुंबई,
प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयातील सर्व विभाग,
मंत्रालयाच्या निरनिराळया विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागाचें व कार्यालयांचे प्रमुख,
वित्त विभागातील सर्व कार्यासने (ग्रंथपाल ५ प्रती ),
निवड नस्ती, कार्यासन, सेवा-३.